**राज्यातील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यांना लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अनुदानीत दराने चणाडाळ व उडीदडाळ वितरीत करताना अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अधापु-२०१८/प्र.क्र.१११/ना.पु.२२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २० ऑक्टोबर, २०१८

वाचा :- शासन निर्णय क्रमांक :- अधापु-२०१८/प्र.क्र.१११/ना.पु.२२, दि. १७ ऑक्टोबर, २०१८.

परिपत्रक :-

राज्यातील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यांना लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अनुदानीत दराने चणाडाळ व उडीदडाळ वितरीत करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधीन दि.१७ ऑक्टोबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

नाफेडने विहित केलेल्या गोदामांमधून चणा व उडीद यांची उचल करणे, त्याची भरडाई करणे, भरडाईअंती प्राप्त झालेली चणाडाळ व उडीदडाळ १ किलोच्या पाकीटामध्ये पाकीटबंद करुन, राज्य शासनाने विहित केलेल्या गोदामांपर्यंत तसेच विहित केलेल्या परिमाणात सदर चणाडाळ व उडीदडाळ पोहोचविण्याकरिता NeML NCDEX Group Company यांनी ई-निविदा प्रक्रिया राबवून मिलर्सची नियुक्ती करण्याबाबत उपरोक्त शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. सदर चणाडाळ व उडीदडाळ उपरोक्त शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार रास्तभाव दुकानांमार्फत राज्यातील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यांना लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अनुदानीत दराने वितरीत करावयाची आहे.

सदर चणाडाळ व उडीदडाळ वितरीत करावयाच्या प्रक्रियेची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे असेल :-

१) उपरोक्त शासन निर्णयान्वये NeML NCDEX Group Company यांनी ई-निविदा प्रक्रियेद्वारे निश्चित केलेल्या मिलर्सनी नाफेडने विहित केलेल्या अकोट, जि.अकोला येथील महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामातून १०३१.०० मे.टन, वरखेड-खामगाव, जि.बुलढाणा येथील महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या च्या गोदामातून ५१२९.१३ मे.टन व पुणतांबा, जि. अहमदनगर येथील केंद्रिय वखार महामंडळाच्या गोदामातून ३८४०.५५ मे.टन चण्याची आणि अकोला येथील महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामातून ५०००.०० मे.टन उडीदाची उचल करावयाची आहे. तसेच, सदर चणा व उडीद या पासून प्राप्त होणारी चणाडाळ व उडीदडाळ सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद

केलेल्या परिमाणाच्या प्रमाणात नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई तसेच, संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी विहित केलेल्या शासकीय गोदामांपर्यंत पोहोचवावयाची आहे.

२) केंद्र शासनाने राज्य शासनास उपलब्ध करून दिलेल्या चणा व उडीदाची नाफेडने विहित केलेल्या गोदामांतून उचल करण्यापूर्वी वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांनी त्या-त्या जिल्ह्यास दिलेल्या चणा व उडीदडाळीच्या नियतनाच्या प्रमाणानुसार चणा ₹२२,१२०/- प्रति मे.टन व उडीद ₹२२,६१०/- प्रति मे.टन या दराने रकमेचा भरणा नाफेडकडे करुन चणा व उडीद यांची उचल करण्याकरिता डि. ओ. प्राप्त करून घ्यावे. सदर डि. ओ. त्यांनी संबंधित मिलर्सना पाठवावे.

३) अकोला, बुलढाणा व अहमदनगर या जिल्ह्यांतील जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या प्रतिनिधीने संबंधित मिलर्सच्या प्रतिनिधींसोबत उपस्थित राहून नाफेडने विहित केलेल्या उपरोक्त गोदामांच्या ठिकाणी असलेला चणा व उडीद प्राप्त होताना तो नाफेडकडून किती प्रमाणात प्राप्त झाला आहे याबाबतची नोंद ठेवावी.

४) NeML NCDEX Group Company यांनी ज्या जिल्ह्यांमधील मिलर्स निश्चित केले आहेत त्या जिल्ह्यातील जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या प्रतिनिधीने त्या मिलर्सच्या मिलमध्ये चणा व उडदाची भरडाई होत असताना व त्यापासून प्राप्त झालेली चणाडाळ व उडीदडाळ १ किलोच्या पाकिटामध्ये पाकीटबंद करेपर्यंत देखरेख ठेवावी.

५) १ किलोच्या पाकिटातील चणाडाळ व उडीदडाळीच्या २५ पाकिटांची १ बॅग तयार करुन शासनाने विहित केलेल्या ठिकाणी व विहित केलेल्या परिमाणात निविदाधारकाने चणाडाळ व उडीदडाळीची पोहोच करावी.

६) चणाडाळ व उडीदडाळ विहित ठिकाणी प्राप्त होताना त्या ठिकाणच्या जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी, NeML NCDEX Group Company यांचे प्रतिनिधी, निविदाधारकाचे प्रतिनिधी यांनी प्राप्त झालेली चणाडाळ व उडीदडाळ मागणीनुसार प्राप्त झाली असल्याबाबत एकत्रीत तपासणी करावी व त्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत NeML NCDEX Group Company यांनी शासनास सादर करावी.

७) नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा (सर्व परिमंडळे), मुंबई तसेच, संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी दरमहा ज्या ठिकाणी साखर साठविण्यात येते त्याच ठिकाणी चणाडाळ व उडीद डाळीची साठवणूक करण्यात यावी. तेथून दुकानदारांपर्यंत सध्या सुरु असलेल्या दुसऱ्या टप्प्याच्या वाहतुकीच्या पद्धतीनुसार रास्त भाव दुकानदारांकडे पोहोचवावी.

८) रास्तभाव दुकानदारांकडून मागणीप्रमाणे चणाडाळ व उडीदडाळीची रक्कम ग्रास प्रणालीद्वारे जमा करुन घेण्यात यावी. दुकानदाराने सदर चणाडाळ व उडीदडाळीचे वितरण ₹३५/- प्रतिकिलो या दराने करावयाचे आहे. सदर चणाडाळ व उडीदडाळीच्या वितरणापोटी रास्त भाव दुकानदारास

शासनातर्फे ₹१.५० प्रतिकिलो एवढे मार्जीन दिले जाणार आहे. त्यामुळे त्यांनी मागणी केलेल्या चणाडाळ व उडीदडाळीच्या प्रमाणानुसार प्राप्त होणाऱ्या चणाडाळ व उडीदडाळीची रक्कम ₹३३.५० प्रतिकिलो या दराने जमा करुन घेण्यात यावी. जमा रकमेमधून ₹ ३२.५० प्रतिकिलो प्रमाणे एकूण होणारी रक्कम संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात एकरकमी भरणा करावी.

९) NeML NCDEX Group Company , सर्व निविदाधारक, नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई, संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी त्यांच्या ई-मेलशी जोडलेल्या Google Drive वरील चणाडाळ व उडीदडाळीसाठीच्या विवरणपत्रामध्ये दररोज वेळोवेळी अद्ययावत माहिती भरावी.

१०) चणाडाळ व उडीदडाळीचे वाटप पूर्ण झाल्यानंतर प्रत्येक महिन्यात “उपयोगिता प्रमाणपत्र” सादर करणे अनिवार्य आहे.

उपरोक्त कार्यपध्दतीनुसार सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी. सदर कार्यवाहीमध्ये कोणत्याही प्रकारे कसूर झाल्यास संबंधितांना जबाबदार धरण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२०१४५१५९१८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Hemant Raghunath Wadikar

Digitally signed by Hemant Raghunath Wadikar
DN: CN = Hemant Raghunath Wadikar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Food Civil Supplies and Consumer Protection Department
Date: 2018.10.20 15:44:48 +05'30'

**(हेमंत वाडीकर)**

**कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.सर्व जिल्हाधिकारी

११.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२.नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४.सर्व उपायुक्त (पुरवठा)
१५.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१६.सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१७.सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१८. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९.सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०.सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२५.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
२६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२८.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२९.वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
३०.प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३१.सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३२. NCDEX e Market Limited, 1st Floor, Ackruti Corporate Park, LBS Road, Kanjur Marg (W), Mumbai.
३३. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).

| शासन परिपत्रक क्र.अधापु २०१८/प्र.क्र.१११/नापु-२२, दि.२० ऑक्टोबर, २०१८ सोबतचे विवरणपत्र | | | |
|---|---|---|---|
| जिल्हानिहाय चणाडाळ व उडीदडाळ वाटपाचे नियतन | | | |
| **Sr. No.** | **District** | **Chana dal Allocation (MT)** | **Urad Dal Allocation (MT)** |
| 1 | Mumbai | 885 | 442 |
| 2 | Thane | 76 | 38 |
| 3 | Palghar | 188 | 94 |
| 4 | Raigad | 187 | 94 |
| 5 | Ratnagiri | 121 | 61 |
| 6 | Sindhudurg | 70 | 35 |
| 7 | Nasik | 381 | 191 |
| 8 | Dhule | 148 | 74 |
| 9 | Nandurbar | 117 | 59 |
| 10 | Jalgaon | 286 | 143 |
| 11 | Ahmednagar | 325 | 163 |
| 12 | Pune Rural | 279 | 140 |
| 13 | Pune city | 169 | 85 |
| 14 | Satara | 179 | 89 |
| 15 | Sangli | 187 | 94 |
| 16 | Solapur Rural | 200 | 100 |
| 17 | Solapur City | 47 | 23 |
| 18 | Kolhapur | 256 | 128 |
| 19 | Aurangabad | 231 | 115 |
| 20 | Jalna | 146 | 73 |
| 21 | Parbhani | 125 | 62 |
| 22 | Hingoli | 90 | 45 |
| 23 | Beed | 178 | 89 |
| 24 | Nanded | 233 | 117 |
| 25 | Osmanabad | 114 | 57 |
| 26 | Latur | 168 | 84 |
| 27 | Amravati | 194 | 97 |
| 28 | Akola | 125 | 62 |
| 29 | Washim | 91 | 45 |
| 30 | Buldana | 180 | 90 |
| 31 | Yavatmal | 197 | 98 |
| 32 | Nagpur Rural | 151 | 76 |
| 33 | Nagpur City | 143 | 71 |
| 34 | Wardha | 98 | 49 |
| 35 | Bhandara | 99 | 49 |
| 36 | Gondia | 100 | 50 |
| 37 | Chandrapur | 152 | 76 |
| 38 | Gadchiroli | 84 | 42 |
| **TOTAL** | | **7000** | **3500** |